**कृषि विभागातील कृषि सेवकांच्या निश्चित वेतनात(एकत्रित मानधन) वाढ करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कृषिआ-१११९/प्र.क्र.६७/१६अे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०१ ऑगस्ट, २०२३.

**संदर्भ**:- १. कृषि व पदुम शासन निर्णय क्र. आकृषि-२५०२/प्र.क्र.६५६/१६अे, दि.०६/०२/२००४
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. कृषिआ-२५०२/प्रक्र-६५६/(१)/१६अे, दि. १७/०२/२००४ .
३. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक कृषिआ-१२१०/प्र.क्र.८/१६अे, दि.१९.०३.२०१२.
४. मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील दि.२२.०९.२०२२ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावनाः-**

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील सततची दुष्काळसदृश परिस्थिती हाताळण्यासाठी व वेतनावरील खर्च नियंत्रित करण्याच्या दृष्टीने कृषि सहाय्यकांची पदे दरमहा रु.२५००/- इतक्या निश्चित वेतनावर(एकत्रित मानधन) कृषि सेवक म्हणून भरणेबाबत शासन निर्णय घेण्यात आला होता. तद्नंतर सन २००९ मध्ये लागू करण्यात आलेल्या सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार नियमित कृषि सहायकांच्या वेतनात वाढ झाली. नियमित कृषि सहाय्यकांची सर्व कर्तव्ये व जबाबदाऱ्या कृषि सेवक पार पाडत असल्यामुळे संदर्भ क्र.३ येथील दि.१९.०३.२०१२ च्या शासन निर्णयान्वये कृषि सेवकांच्या निश्चित वेतनात(एकत्रित मानधन) रु.२५००/- वरुन रु.६०००/- एवढी वाढ करण्यात आली होती. तेव्हापासून कृषि सेवक रु.६०००/- एवढया निश्चित वेतनावर काम करत आहेत. त्यामुळे सातव्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने कृषि सेवकांच्या निश्चित वेतनात(एकत्रित मानधन) वाढ करण्याची मागणी महाराष्ट्र राज्य कृषि सहाय्यक संघटना व कृषि सेवकांकडून करण्यात येत आहे. तद्नुषंगाने मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.२२.०९.२०२२ रोजी आयोजित बैठकीच्या इतिवृत्ताच्या अनुषंगाने सादर करण्यात आलेल्या कृषिसेवकांच्या निश्चित वेतनात(एकत्रित मानधन) वाढ करण्याच्या प्रस्तावावर मा.मंत्रीमंडळाच्या दि.२७.०७.२०२३ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार कृषिसेवकांच्या निश्चित वेतनात(एकत्रित मानधन) वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

कृषि विभागातील कृषि सेवकांच्या सध्या असलेल्या रु.६०००/- या निश्चित वेतनात(एकत्रित मानधन) रु.१६०००/- एवढी वाढ करण्यात येत आहे.

२. सदरची निश्चित वेतनातील(एकत्रित मानधन) वाढ ही दि. १ ऑगस्ट, २०२३ पासून लागू करण्यात येत आहे. या प्रित्यर्थचा खर्च हा सद्यस्थितीत कृषिसेवकांच्या मानधनाचा खर्च ज्या लेखाशिर्षामधून भागविण्यात येतो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भ क्र.२१४/२०२३/व्यय-१, दि.३१.०७.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध संगणक संकेतांक क्र. २०२३०८०११६२९३९९३०१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SARITA RISHI
BANDEKAR
DESHMUKH

Digitally signed by SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E40A063B6B4E8F59F91F350AA6FEC292A55DB5BF8829C64D6C44E00A701CDAAC, cn=SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
Date: 2023.08.01 16:31:31 +05'30'

**( सरिता बांदेकर-देशमुख )**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत-**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, उपमुख्यमंत्री कार्यालय, मुंबई.
४. सर्व विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
५. मा.मंत्री(कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त(कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२(लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता) मुंबई नागपूर
१०. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी.
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१२. सर्व उप कोषागार अधिकारी
१३. सर्व तालुका कृषि अधिकारी.
१४. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती.